वितरण आदेश क्र.३
केंद्र हिस्सा (७५%)

इंदिरा आवास योजनेअंतर्गत केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला दुसऱ्या हप्ताचा निधी वितरीत करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
# ग्राम विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः इंआयो-२०१४/प्र.क्र.४३९/योजना-१०

बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड
फोर्ट, मुंबई-४०० ००१.
तारीख: ०७ फेब्रुवारी, २०१५.

**वाचा §**

१) केंद्र शासनाची पत्र क्र. J-१२०२५/१/२०१४-RH (A/c)-२-Mah.(२nd inst), J-१२०२५/१/२०१४-RH (A/c)-२A-Mah.(२nd instt) व J-१२०२५/१/२०१४-RH (A/c)-२B-Mah.(२nd instt), दि.१८ डिसेंबर, २०१४.

**प्रस्तावना §**

केंद्रीय योजना आयोगाने नियुक्त केलेल्या चतुर्वेदी समितीच्या शिफारशीनुसार केंद्र शासनाने सर्व केंद्र पुरस्कृत योजनांची पुनर्रचना ६६ केंद्र पुरस्कृत योजनांमध्ये केली आहे. त्यानुसार इंदिरा आवास योजनेसाठी केंद्र शासनाने दिलेला नवीन अ.क्र.३६ असा आहे. केंद्र शासनाने सन २०१४-१५ या वित्तीय वर्षापासून इंदिरा आवास योजनेचा निधी थेट जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना वितरीत न करता तो राज्याच्या एकत्रित निधीममध्ये समाविष्ट करण्याचा निर्णय घेतला आहे. राज्याच्या एकत्रित निधीमधून तो जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना राज्यस्तरावरून वितरीत करावयाचा आहे. त्यानुसार केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व सर्वसधारण संवर्गाचा दुसरा हप्त्याचा निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय§**

सन २०१४-१५ या वित्तीय वर्षासाठी केंद्र पुरस्कृत इंदिरा आवास योजनेसाठी सोबत जोडलेल्या विवरणपत्र "अ" नुसार केंद्र शासनाने अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व सर्वसधारण संवर्गासाठी उपलब्ध करून दिलेला केंद्र हिश्याच्या दुसऱ्या हप्त्याचा निधी रू.४४७५७.८८२ लक्ष (रूपये चारशे सत्तेचाळीस कोटी सत्तावन्न लक्ष अठ्ठयांशी हजार दोनशे फक्त) इतका निधी वितरीत करण्यास शासन मंजूरी देत आहे.

विवरणपत्र "अ", मध्ये लेखाशिर्षातंर्गत जिल्हानिहाय खाली दर्शविल्याप्रमाणे रकमा संबंधित जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्याकडे शासन सुपूर्द करीत असून, त्या संबंधित जिल्हयाच्या कोषागारातून तात्काळ रोखीने काढण्यास शासन मंजूरी देत आहे. सदरचा खर्च खालील दर्शविलेल्या अर्थसंकल्पीय लेखाशिर्षाखालील सन २०१४-१५ च्या उपलब्ध तरतूदीमधून भागविण्यात यावा.

| विवरणपत्र | अर्थसंकल्पिय लेखाशिर्ष व संकेतांक क्रमांक | वितरीत करण्यात आलेली एकूण रक्कम (रूपये लाखात) | |
|---|---|---|---|
| | | अंकी | अक्षरात |
| जोडपत्र-अ (रकाना क्र.३) (SCP) | **मागणी क्र. एल- ३**<br>मुख्य लेखाशीर्ष - २५०५ ग्रामीण सेवा योजन,६० इतर कार्यक्रम, ७०२ जवाहर समृध्दी ग्राम योजना, (०१) इंदिरा आवास योजना (०१) (०३) इंदिरा आवास योजना - अनुसूचित जाती उपयोजना (वि.घ.यो.) (केंद्र पुरस्कृत योजना) (केंद्र हिस्सा (७५%) (२५०५३००१) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | रू.१२७४२.६०० | रूपये एकशे सत्तावीस कोटी बेचाळीस लक्ष साठ हजार फक्त |
| जोडपत्र -अ (रकाना क्र.४) (ST) | **मागणी क्र.टी-५**<br>मुख्य लेखाशीर्ष - २५०५ ग्रामीण रोजगार - ६०, इतर कार्यक्रम-७९६, जनजाती क्षेत्र योजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०५) इंदिरा आवास योजना (केंद्र हिस्सा), (२५०५ २९९२) ३३, अर्थसहाय्य | रू.२१७५४.००० | रूपये दोनशे सतरा कोटी चौपन्न लक्ष फक्त |
| जोडपत्र - अ (रकाना क्र.५) (सर्वसाधारण) | **मागणी क्र. एल- ३**<br>मुख्य लेखाशीर्ष - २५०५ ग्रामीण सेवा योजन, ६० इतर कार्यक्रम, ७०२ जवाहर समृध्दी ग्राम योजना, (०१) इंदिरा आवास योजना (०१) (०४) इंदिरा आवास योजना - सर्वसाधारण योजना (केंद्र पुरस्कृत योजना) (केंद्र हिस्सा) (७५%) **(२५०५३०१२)**<br>३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | रू.१०२६१.२८२ | रूपये एकशे दोन कोटी एकसष्ट लक्ष अठ्ठावीस हजार दोनशे फक्त |

जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांनी सदरहू निधी मिळाल्यानंतर हा निधी संबंधित यंत्रणांना / पंचायत समित्यांना एक दिवसांच्या आत वितरीत करावा. यंत्रणांना/अधिका-यांना वितरीत केलेल्या निधीच्या आदेशाची एक प्रत न चुकता या विभागास पृष्ठांकित करावी. वितरीत निधी योजनाबध्द नियोजन करुन खर्च करावा. तसेच सदरचा निधी हा केंद्र हिश्याचा दुसरा हप्ता असल्याने तो माहे मार्च, २०१५ अखेर पर्यंत १०० टक्के खर्च होईल, याची खबरदारी घ्यावी.

हा शासन निर्णय (१) वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक: ७०७/२०१४, दि.२२.१२.२०१४ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने आणि योजनेच्या सन २०१४-१५ च्या अर्थसंकल्पिय तरतूदीचे मासिक विवरण पत्र (Monthly Cash Flow) यास अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२०६१६५०४७०७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Raghunath Harishchandra Shrawanpatil

Digitally signed by Raghunath Harishchandra Shrawanpatil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Raghunath Harishchandra Shrawanpatil
Date: 2015.02.07 13:09:01 +05'30'

**(र.ह.श्रावणपाटील)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा. मंत्री ग्राम विकास यांचे सचिव
२) सर्व विभागीय आयुक्त
३) सर्व जिल्हाधिकारी
४) वित्त विभाग, कार्यासन क्रमांक व्यय-१५ व अर्थसंकल्प ३ व १७
५) आदिवासी विकास विभाग, कार्यासन क्रमांक ६, ७, १२,मंत्रालय, मुंबई-४०००३२
६) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७) नियोजन विभाग,मंत्रालय, मुंबई-४०००३२
८) महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
९) महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
१०) महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखापरिक्षा), मुंबई
११) महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखापरिक्षा) नागपूर
१२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व जिल्हे)
१३) प्रकल्प संचालक,जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा ( सर्व जिल्हे )
१४) जिल्हा कोषागार अधिकारी ( सर्व जिल्हे )
१५) अप्पर संचालक,एकात्मिक ग्रामीण विकास कार्यक्रम कक्ष,बांधकाम भवन, मुंबई -१(५ जादा प्रतीसह)
१६) निवड नस्ती (कार्या. योजना-१०)